सन २०१३-१४ च्या टंचाई कालावधीसाठी
संगमनेर नगरपरिषदेच्या (जिल्हा अहमदगनर)
तातडीच्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय
मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१४/प.क. ८३/पापु १४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १९ जुलै, २०१४

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०९९/प.क.१४/पापु १४, दि. २१.८.२००९.**
२) **विभागीय आयुक, नाशिक यांचे क. नपा/२-१/६६२३/२०१४, दि. २१/६/२०१४ चे पत्र**
३) **मुख्याधिकारी, संगमनेर नगरपिरषद, संगमनेर यांचे क्रमांक पा.पु.३/२४१/२०१४, िदि. ११/७/२०१४ चे पत.**

**प्रस्तावना :-**

सन २०१३-१४ च्या टंचाई कालावधीत संगमनेर नगरपरिषद (जिल्हा अहमदनगर) क्षेत्रात निर्माण झालेल्या पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग यांनी संगमनेर नगरपरिषदेने शहर व उपनगरात ३० विंधन विहीरी घेण्यासाठी रु. १६,९८,३६०/- किमतीचा प्रस्ताव सचिवस्तरीय स्थायी समितीच्या दि. १४/७/२०१४ रोजी झालेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या बैठकीत प्रशासकीय मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला होता.

## शासन निर्णय :-

संगमनेर नगरपरिषदेने सादर केलेल्या प्रस्तावासंदर्भात, सचिव स्तरीय स्थायी समितीने प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार शहर व उपनगरात ३० विंधन विहीरी घेण्यासाठी रु. १६,९८,३६०/- (रुपये सोळा लक्ष अठ्ठयाण्णव हजार तीनशे साठ फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास, या आदेशान्वये तातडीच्या पाणी पुरवठा योजनेअंतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजेनेसाठी शासनाकडून एकूण रु. १६.९८ लक्ष खर्चाच्या ९०% म्हणजेच १५.२८२ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन देण्यात येईल. तर उर्वरित १०% म्हणजेच १.६९८ लक्ष इतकी रक्कम संगमनेर नगर परिषदेने लोक वर्गणीच्या रुपाने भरावी.
२. शहरातील पाणी पुरवठयाबाबत स्वतंत्र यंत्रणेमार्फत पाणी लेखापरीक्षण करण्यात यावे.

३. तातडीच्या पाणी पुरवठा योजनांतर्गत नगरपालिका क्षेत्रात घेण्यात आलेल्या व अस्तित्वातील सर्व विंधण विहीरींच्या पुनर्भरणाची कामे नगरपरिषदेने त्यांच्या स्वत:च्या निधीतून घेणे बंधनकारक राहील. एकदा तातडीच्या पाणी पुरवठा योजनांतर्गत विंधण विहीरी घेतल्यास, पुढील वर्षी ही उपाययोजना मंजूर करतांना, नगरपालिकेने त्यांच्या खर्चाने शहरातील विंधण विहीरींच्या पुनर्भरणाची कामे पूर्ण केल्याचे भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

४. नगरपालिकेने तातडीच्या पाणी पुरवठा योजने अंतर्गत कूपनलिका/विंधण विहीरींची कामे खाजगी कंत्राटदारांकडून निविदा पध्दतीने अथवा जिल्हा परिषदांकडून अथवा भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणेकडून करुन घेण्याबाबत जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्याशी समन्वय साधावा.

५. खाजगी विंधण यंत्रे ही त्या जिल्ह्यात संबंधित जिल्हा परिषदेने ज्या दराने भाड्याने घेतली आहेत त्याच दराने अथवा त्यापेक्षा कमी दराने भाड्याने लावावीत. परंतु, नागरी संस्थेचे मर्यादित क्षेत्र लक्षात घेऊन जर जिल्हा परिषदेने निश्चित केलेल्या दराने खाजगी विंधण यंत्रे उपलब्ध होत नसतील तर शासनाने विहित केलेल्या दराचे अधीन राहून नगरपालिकेने निविदा मागवून विंधण यंत्रे भाड्याने घ्यावीत.

६. खाजगी विंधण यंत्रांना द्यावयाचे दर भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमार्फत निश्चित करण्यात आलेल्या दरापेक्षा जास्त असू नयेत.

२. सदर विंधन विहीरी तातडीने घेण्याबाबतची कार्यवाही संगमनेर नगर परिषदेने जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्या समन्वयाने करावयाची आहे. तसेच, शासनाच्या दिनांक २१.८.२००९ च्या शासन निर्णयातील सर्व अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

३. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य,०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१- राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) -३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भगविण्यात यावा. व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय दि.२७ नोव्हेंबर २००२ च्या शासन निर्णय क्र.टंचाई २००२/प्र.क्र.३४५/पापु १४ अन्वये पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना/उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या सचिव स्तरीय स्थायी समितीच्या दि. १४/७/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७१९१६५३३४११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KUMATGI RAJENDRA B

Digitally signed by KUMATGI RAJENDRA B
DN: CN = KUMATGI RAJENDRA B, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.07.19 04:51:02 -07'00'

**( राजेंद्र कुमटगी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
७. विभागीय आयुक्त, नाशिक
८. जिल्हाधिकारी, अहमदनगर
९. मुख्याधिकारी, संगमनेर नगरपरिषद, संगमनेर.
१०.उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नाशिक
११.मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
१२.उप सचिव (पापु-१४) पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
१३.पापु-१४ संग्रहासाठी.